प्रादेशिक परिवहन कार्यालय, धुळे येथील नवीन इमारतीकरिता फर्निचर कामाच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०४२५/प्र.क्र. १२६ /परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १३ जून, २०२५

**वाचा :-**

परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबां(५२)/०३२४/का-१०(१)/२०२४/ जा.क्र.१२३०९, दि.२९ ऑक्टोबर, २०२४.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय,धुळे या कार्यालयाच्या नवीन इमारतीकरिता फर्निचर कामासाठी एकूण रु. २,८४,६०,२६३/- (अक्षरी रुपये दोन कोटी चौऱ्याऐंशी लाख साठ हजार दोनशे त्रेसष्ठ फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

उपर्निर्दिष्ट वाचा येथील परिवहन आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावानुसार प्रादेशिक परिवहन कार्यालय, धुळे या कार्यालयाच्या नवीन इमारतीकरिता फर्निचर कामासाठी एकूण रु. २,८४,६०,२६३/- (अक्षरी रुपये दोन कोटी चौऱ्याऐंशी लाख साठ हजार दोनशे त्रेसष्ठ फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील तपशिलाप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरील अंदाजपत्रकाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

प्रादेशिक परिवहन कार्यालय, धुळे या कार्यालयाच्या नवीन इमारतीकरिता फर्निचर तयार करणे.

| Sr.No | Work Description | Amount |
|---|---|---|
| 1. | Interior Work | 23121242.20 |
| | Add For GST 18% On (A) | 4161823.60 |
| | Add For Insurance 1.0% On (A) | 231212.42 |
| | Lab Testing Charges | 21135.00 |
| | Contengencies 2.00% | 462424.84 |
| | Architectural Fees 2.0% on (A) | 462424.84 |
| | **Total** | 28460262.90 |
| | **Say** | 28460263.00 |

(अक्षरी रुपये दोन कोटी चौऱ्याऐंशी लाख साठ हजार दोनशे त्रेसष्ठ फक्त)

३. सदर प्रशासकीय मान्यता खालील अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

ii. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही - २०१३ /प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

iii. सदर कामाचा खर्च गृह (परिवहन) विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात येईल.

iv. नियोजित जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

v. सदर कामाची ई-निविदा करताना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी

४. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर (२०४१ ०३३२) (०१) (०७) साधन सामुग्रीची खरेदी (कार्यक्रम) ५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री ” या लेखाशीर्षाखालील उपलब्ध असणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला,उप विभाग दोन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक ७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०६१३१२३२३४४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.06.13 12:33:44 +05'30'

**( सु.बा.आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

३. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
४. अपर मुख्य सचिव,गृह (परिवहन) विभाग,मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,धुळे
८. अधिदान व लेखा अधिकारी, धुळे
९. जिल्हा कोषाधिकारी, जिल्हा धुळे
१०.कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती (परि-४)